**राज्यातील दुष्काळी भागातील ग्रामीण नळपाणी पुरवठा योजनांची थकीत विद्युत देयकांची रक्कम टंचाई निधीतून देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- २०१८/ प्र.क्र. २४६/म-७**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २१ डिसेंबर, २०१८

वाचाः- १) शासन निर्णय क्रमांकः- एससीवाय २०१८ /प्र.क्र.८९/म-७
दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८
२) शासन निर्णय क्रमांकः- एससीवाय २०१८ /प्र.क्र.८९/म-७
दिनांक ६ नोव्हेंबर, २०१८
३) शासन निर्णय क्रमांकः- एससीवाय २०१८/प्र.क्र.२४६/म-७
दिनांक ११ डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

सन २०१८ च्या खरीप हंगामात राज्यात दुष्काळ घोषित केलेल्या १५१ तालुके व दिनांक ६ नोव्हेंबर, २०१८ अन्वये दुष्काळ घोषित केलेल्या २६८ महसुली मंडळात तसेच भविष्यात दुष्काळ घोषित झाल्यास अशा भागातील राज्यातील ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांची प्रलंबित असलेल्या थकीत विद्युत देयकांच्या मुद्दल रकमेपैकी ५% रक्कम सध्या मदत व पुनर्वसन विभागाकडून भरण्यात येईल व अशा योजनांचा खंडीत वीज पुरवठा सुरु करण्यात यावा. तसेच राज्यातील गंभीर दुष्काळी परिस्थिती, पाणीसाठे यांचा विचार करता नोव्हेंबर २०१८ ते जून २०१९ या ८ महीन्यांच्या कालावधीतील दुष्काळ घोषित केलेल्या १५१ तालुके व २६८ महसुली मंडळातील ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांची चालू विद्युत देयके मदत व पुनर्वसन विभागाच्या टंचाई निधीमधून अदा करण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये घेण्यात आला आहे.

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांबाबत घेतलेल्या उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने सन २०१८ च्या खरीप हंगामात दुष्काळ जाहीर केलेल्या १५१ तालुके व २६८ महसुली मंडळामधील शहरी नळ पाणी पुरवठा योजनांबाबतही उपरोक्त प्रमाणे निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. दिनांक १८ डिसेंबर, २०१८ रोजी मंत्रिमंडळ उपसमिती बैठक क्र. ५ मध्ये झालेल्या निर्णयानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

महसुल व वन विभाग शासन निर्णय दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८ अन्वये राज्यात दुष्काळ घोषित केलेल्या १५१ तालुके व दिनांक ६ नोव्हेंबर, २०१८ अन्वये दुष्काळ घोषित केलेल्या २६८ महसुली मंडळात तसेच भविष्यात दुष्काळ घोषित झाल्यास अशा भागातील राज्यातील शहरी पाणी नळ पुरवठा योजनांची

प्रलंबित असलेल्या थकीत विद्युत देयकांच्या मुद्दल रकमेपैकी ५% रक्कम सध्या मदत व पुनर्वसन विभागाकडून भरण्यात येईल व अशी रक्कम भरल्यानंतर अशा योजनांचा खंडीत वीज पुरवठा सुरु करण्यात यावा. तसेच राज्यातील गंभीर दुष्काळी परिस्थिती, पाणीसाठे यांचा विचार करता नोव्हेंबर २०१८ ते जून २०१९ या ८ महिन्यांच्या कालावधीतील, दुष्काळ घोषित केलेल्या १५१ तालुके व २६८ महसुली मंडळातील शहरी नळ पाणी पुरवठा योजनांची चालू विद्युत देयके मदत व पुनर्वसन विभागाच्या टंचाई निधीमधून अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनार्थ अदा करावयाची रक्कम २२४५ या लेखाशिर्षाखाली मागणी क्र. सी-६ , १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा (९२), राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च (९२) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ २१८५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा . हा निधी उर्जा विभागाकडे सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२११०५९२६३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2018.12.21 11:07:18 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई,
२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव , (उर्जा) उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) सर्व जिल्हाधिकारी
६) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
७) महालेखापाल १/२, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
८) संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
९) वित्तीय सल्लागार व सह सचिव (मदत व पुनर्वसन)
१०) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६) मंत्रालय मुंबई
११) कक्ष अधिकारी (म-३/म-११) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती, कायार्सन म-७